**पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावान्यायाधिकरण, मालेगांव यांना कार्यालय प्रमूख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : एमसीटी ०७०१/९६८/सीआर-६४/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १३ फेब्रुवारी, २००२

**वाचा :**
(१) शासन अधिसूचना क्रमांक :एमसीटी-०४९८/सीआर-२३(ब)/परि-५,दि. ११.८.२०००
(२) जिल्हा व सत्र न्यायाधिश नासिक यांचे पत्र क्रमांक : वित्त/सी-३/३१०२/२००१, दिनांक १०.९.२००१ चे पत्र
(३) प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपिल शाखा) यांचे पत्र क्रमांक अे/१२२४/८०, दिनांक १२.१०.२००१

**<u>शासन निर्णय :</u>** मोटार वाहन कायदा १९८८ (१९८८ चा ५९) च्या कलम १६५ (२) च्या अधिकारानुसार शासन अधिसूचना गृह विभाग क्रमांक एमसीटी-०४९८/ सीआर-२३ (ब),परि-५,दिनांक ११.८.२००० अन्वये नासिक जिल्हयातील मालेगाव येथे मोटार अपघाताचे दावे चालविण्यासाठी एक सदस्यीय मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापण्यात आले आहे व अपर जिल्हा व सत्र न्यायाधीश, मालेगाव यांची या न्यायाधिकरणावर पदसिध्द सदस्य म्हणून नेमणूक केली आहे. आता या आदेशान्वये पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मालेगाव यांना या न्यायाधिकरणाचे कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-१०९९/प्र.क्र.१०/९९/विनियम, दि.१.९.९९ मधील अ.क्र. ३ वरील नियम क्रमांक २ अन्वये मंत्रालयीन प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र. कृ.सगदेव )
उप सचिव, गृहविभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपिल शाखा), मुंबई. (पत्राने)
जिल्हा व सत्र न्यायाधिश व पदसिध्द सदस्य ,मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नासिक
अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश व पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मालेगांव
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरिक्षा महाराष्ट्र-१,मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, नासिक / कोषागार अधिकारी, मालेगाव.
विधि व न्याय विभाग कार्यासन १२ / कार्यासन ३
वित्त विभाग ( विनियम ) / व्यय -८
गृह विभाग, आस्थापना - ४ ( सर्वांचे माहितीसाठी )
निवडनस्ती प्रतिकक्ष -४.